**सोलापूर महानगरपालिका क्षेत्रातील वस्त्रोद्योग व इतर उद्योगांना महानगरपालिका करात सवलत देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :** सोमपा-२००४/२३०३/प्रक्र-३५/नवि-२५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० एप्रिल २००४

**वाचा :** १) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र दिनांक २३.७.२००३ व क्र.नआ/वै/१७४ दिनांक २.८.२००३
२) सोलापूर महानगरपालिकेचा ठराव क्रमांक १०९ दिनांक ३.७.२००३
३) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग क्र.यंत्रमाग - १०२००३/प्रक्र-१५२/टेक्स-३ दिनांक ११.२.२००४

**प्रस्तावना:** सोलापूर शहरातील उद्योगधंदे बंद पडल्याचे प्रमाण वाढत चालले आहे. महानगरपालिका करातून सुट दिल्यास उद्योगधंद्यावरील कराचा बोजा कमी होण्याच्या दृष्टीने तसेच नवीन उद्योगांना चालना मिळण्यासाठी सोलापूर महानगरपालिकेने उपरोक्त अ.क्र.२ मध्ये नमूद केलेल्या ठरावाद्वारे सोलापूर महानगरपालिका क्षेत्रातील वस्त्रोद्योगासह इतर उद्योगांना मिळकत करात सूट देण्याचा ठराव संमत केला आहे. सदर ठरावाची अंमलबजावणी करण्यास शासनाची मान्यता देण्याची विनंती आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांनी संदर्भाधिन अ.क्र. १ येथील दिनांक २३.७.२००३ रोजीच्या पत्रान्वये केली आहे. त्याचप्रमाणे शासनाच्या संदर्भाधिन अ.क्र.३ येथील दिनांक ११.२.२००४ रोजीच्या शासन निर्णयान्वये , यंत्रमागधारकांना आर्थिक अडचणीतून बाहेर येऊन , व्यवसायात उभा राहता यावे म्हणून महापालिकेने या व्यवसायासाठी शक्य आहे त्या सवलती उपलब्ध करुन देण्याची शिफारस स्विकारुन अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेतला आहे. ही सर्व पार्श्वभूमी विचारात घेऊन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :** आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांच्या प्रस्तावानुसार, सोलापूर महानगरपालिका क्षेत्रातील वस्त्रोद्योग व इतर उद्योगांना महानगरपालिका करातून सूट देण्याचा सोलापूर महानगरपालिकेने संमत केलेल्या ठराव क्रमांक १०९ दिनांक ३.७.२००३ ची अंमलबजावणी करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ मधील कलम १४९ अन्वये शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( प्र.मा. माळवदकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
१)मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.वस्त्रोद्योग राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री , नगर विकास याचे स्वीय सहाय्यक
५) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका
६) सचिव, वस्त्रोद्योग , पणन व सहकार विभाग
निवडनस्ती नवि-२५